**राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणासाठी नवीन संकेतस्थळ वेबसाईट तयार करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आपना -१५१९/ प्र.क्र.१३३/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २२ सप्टेंबर, २०२१

वाचा :- १. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.रासनिप्रा/ संगणक/ कक्ष-१५/ website& cloud/ विमान्यता / स्मरण/ १५०४/ २०२१ दिनांक ०६.०५.२०२१ रोजीचे पत्र.
२. प्रकल्प अंमलबजावणी समिती यांचे क्र.बैठक -२०२०/ प्र.क्र.३/१६स, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२१ रोजीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण हे स्वतंत्र व स्वायत्त निवडणुक प्राधिकरण असून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम ७३ (सीबी) (१) नुसार मतदार यादीचे अधिक्षण, संचालन व नियंत्रण तसेच, निवडणुक कार्यक्रम घोषित करणे, प्रत्यक्ष मतदान घेणे, निवडणुकी दरम्यान आचारसंहितेचे पालन केले जाते किंवा नाही हे तपासणी करणे, निवडणुका सुरळीत, शांततापुर्ण व भयमुक्त वातावरणात पार पाडण्याची जबाबदारी प्राधिकरणावर असून त्यासाठी महाराष्ट्र सहकारी संस्था (समितीची निवडणूक) नियम २०१४ चे नियम ६ नुसार मतदार याद्या प्राधिकरणाचे संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्याची तरतूद आहे. तसेच, राज्यातील सर्व कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या निवडणुका घेण्याची वैधानिक जबाबदारी राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणावर सोपविली आहे.

उपरोक्त कामकाज सुरळीतपणे पार पाडण्याच्या दृष्टीने प्राधिकरणाने वेबसाईट बनविणेस मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. महा आय टी यांनी दिलेल्या Cloud Computing व मुळ प्रस्ताव असे एकूण १३,५६,१२०/- इतक्यात रकमेच्या कामास व खर्चास, प्रशासकीय व वित्तीय एकत्रित मान्यता मिळणेसाठी प्राधिकरणाने शासनाकडे प्रस्ताव सादर केला. विषयांकीत प्रकरणी दिनांक १६ फेब्रुवारी, २०२१ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीची ( PIC) बैठक झाली असून सदर बैठकीमध्ये राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणासाठी नवीन वेबसाईट तयार करण्यासाठी रुपये ७,८२,४१७/- अधिक Cloud Computing करण्यासाठी एक वर्षाकरिता रुपये ५,७३,७०३/- असे एकूण रुपये १३,५६,१२०/- इतक्या रकमेच्या खर्चास, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली.

सहकारी संस्थांच्या निवडणुका व कृषि उत्पन्न बाजार समितीच्या निवडणुकीकरिता त्यांचे नियंत्रक कार्यालय असलेल्या राज्य स्तरावरील राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणाचे संकेतस्थळ नसल्याने राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणाचे कामकाज सुरळीत होण्यासाठी संकेतस्थळ (वेबसाईट) सुरू करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १६ फेब्रुवारी, २०२१ रोजी झालेल्या बैठकीत राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणासाठी नवीन वेबसाईट तयार करण्यासाठी रुपये ७,८२,४१७/- अधिक Cloud Computing करण्यासाठी एक वर्षाकरिता रुपये ५,७३,७०३/- असे एकूण रुपये १३,५६,१२०/- इतक्या रकमेच्या खर्चास, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणामार्फत महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम ७३ (सीबी) (१) नुसार मतदार यादीचे अधिक्षण, तसेच, राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूक पार पाडण्याची वैधानिक जबाबदारी व राज्यातील सर्व कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या निवडणुका घेण्याची वैधानिक जबाबदारी राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणावर सोपविली आहे. सहकारी संस्थांच्या निवडणुका व कृषि उत्पन्न बाजार समितीच्या निवडणुकीकरिता त्यांचे नियंत्रक कार्यालय असलेल्या राज्य स्तरावरील राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणाचे संकेतस्थळ नसल्याने राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरणाचे कामकाज सुरळीत होण्यासाठी संकेतस्थळ (वेबसाईट) सुरू करण्याकरीता, नवीन वेबसाईट तयार करण्यासाठी रुपये ७,८२,४१७/- अधिक Cloud Computing करण्यासाठी एक वर्षाकरिता रुपये ५,७३,७०३/- असे एकूण रुपये १३,५६,१२०/- इतक्या रकमेच्या खर्चास, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या कामाचा खर्च सन २०२१-२०२२ अंतर्गत मागणी क्र. व्ही-२ "२०७० इतर प्रशासनिक सेवा(००)(८००) इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण ( २०७००८८२) (१७) संगणक खर्च" या लेखाशिर्षाखालील उपलब्ध मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ चे शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला उपविभाग दोन चे अ.क्र.२७-अ वरील नियम क्र.७६ अन्वये संगणकीय यंत्रणेत वाढ करणेबाबत रुपये ४ लाखांपेक्षा जास्त होणाऱ्या खर्चास मंजुरी देणेचे प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२२१३२५२६६९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2021.09.22 13:27:45 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
३) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
४) अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभग, मंत्रालय,मुंबई.

५) उप सचिव (व्यय-२) व (अर्थ-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. मा.प्रधान सचिव (सहकार व पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

२. निवडनस्ती कार्यासन १३-स.